सन २०१४-१५ च्या टंचाई कालावधीसाठी नगरपरिषद हिंगणघाट, जिल्हा वर्धा यांना पिण्याच्या पाण्याच्या टंचाई अंतर्गत घेण्यात आलेल्या विंधन विहिरीसाठी निधी वितरीत करण्याबाबत.

**महाराष्ट्र शासन**
**पाणी पुरवठा व स्वच्छता विभाग**
**शासन निर्णय क्रमांकः टंचाई २०१७/प्र.क्र. ०९ /पापु १४**
**जी. टी. रुग्णालय इमारत संकुल, ७ वा मजला,**
**मंत्रालय, मुंबई ४०० ००१**
दिनांक : ०१ ऑक्टोबर, २०२१

<u>वाचा</u> :-

१) शासन निर्णय, पाणी पुरवठा व स्वच्छता विभाग, क्रमांकः टंचाई २००८/प्र.क्र. १४९/पापु १४, दिनांक २१.८.२००९.
२) शासन निर्णय, पाणी पुरवठा व स्वच्छता विभाग, क्रमांकः टंचाई/२०१८/प्र.क्र.१९१/पापु-१४, दिनांक: २७/११/२०१८.
३) जिल्हाधिकारी, वर्धा याची पत्र क्र.अका/नपाप्र/संक्र.६२ (१४)/कावि-७६८, दिनांक: २६ फेब्रुवारी, २०१४.
४) विभागीय आयुक्त तथा प्रादेशिक संचालक, नगर पालिका प्रशासन, नागपूर यांचे पत्र क्रमांक : नपाप्र/अ.का.१९(१)/कावि-२५२/२०१८, दिनांक २२.१०.२०१८
५) जिल्हाधिकारी, वर्धा याची पत्र क्रमांक : कलि/नपाप्र/पाणी.टं. अनु. मागणी/कावि-२२८/२०१६, दिनांक ०४ मार्च, २०१६ व पत्र क्रमांक : अका/नपाप्र/आस्था/कावि-१२३०/२१, दिनांक २४ सप्टेंबर, २०२१

**<u>प्रस्तावना -</u>**

सन २०१४-१५ च्या टंचाई कालावधीत हिंगणघाट नगरपरिषद, जि. वर्धा क्षेत्रात निर्माण झालेल्या पिण्याच्या पाणी टंचाई निवारणार्थ जिल्हाधिकारी, वर्धा यांनी संदर्भ क्रमांक-०३ अन्वये शहराच्या विविध भागात २३ विंधन विहिरी घेणे या कामांचा समावेश असलेल्या रु. १४.६३ लक्ष किंमतीचा तातडीच्या पाणी पुरवठा योजनेस प्रशासकीय मान्यता दिली आहे. संदर्भ क्र. ५ अन्वये सदर रक्कमेतुन १० टक्के लोकवर्गणी वजा जाता एकुण रु.१३.१७ लक्ष

इतक्या रक्कमेचा निधी मागणीचा प्रस्ताव शासनाकडे मान्यतेसाठी सादर केला आहे. त्यानुषंगाने सदर प्रस्तावास मान्यता देणेची बाब शासनाच्या विचाराधीन होती.

**शासन निर्णय** -

प्रस्तावनेत नमूद केलेली वस्तुस्थिती विचारात घेऊन सन २०१४ च्या उन्हाळयामध्ये नगरपरिषद हिंगणघाट क्षेत्रात पिण्याच्या पाण्याच्या टंचाई अंतर्गत घेण्यात आलेल्या उपाययोजनांवरील खर्च भागविण्यासाठी रुपये १३.१७ लाख (रुपये तेरा लाख सतरा हजार फक्त) इतका निधी विभागीय आयुक्त, नागपूर यांना पुढील अटींच्या अधिन राहून वितरीत करण्यात येत आहे :-

१) सदर योजनेच्या किंमतीच्या एकूण रुपये १४.६३ लाख खर्चाच्या ९०% म्हणजेच रुपये १३.१७ लाख इतके अनुदान शासनाद्वारे उपलब्ध करुन दिले जाईल. उर्वरीत रक्कम म्हणजेच योजनेच्या १०% रुपये १.४६ लाख एवढी रक्कम लोकवर्गणी म्हणून नगरपरिषद हिंगणघाट यांनी भरावयाची आहे.

२) सदर योजनेची १० टक्के लोकवर्गणी पोटी नगरपरिषद हिंगणघाट यांनी प्रथमत: खर्ची टाकल्यानंतरच निधी विभागीय आयुक्त यांनी जिल्हाधिकारी, वर्धा यांचे मार्फत नगरपरिषद हिंगणघाट यांना वितरीत करण्यात यावा.

३) विभागीय आयुक्त, नागपूर यांनी जिल्हाधिकारी, वर्धा यांच्याकडे सदर योजनेकरिता योजनेचे देय अनुदान वितरीत करावे.

४) जिल्हाधिकारी, वर्धा यांनी याबाबतची उपयोगिता प्रमाणपत्र सादर करावीत.

२. याबाबत होणारा खर्च मागणी क्र. वाय-२, (०२) (११) आकस्मिक पिण्याच्या पाण्याच्या टंचाई निवारणार्थ घेण्यात येणा-या तात्पुरत्या उपाययोजनांसाठी महानगरपालिका/ नगर परिषदांना सहायक अनुदान (अनिवार्य), ३१ सहायक अनुदाने (वेतनेत्तर), (२२१५ए२०१)या लेखाशिर्षाखालील तरतूदीमधून भागविण्यात यावा व त्याखाली अंतिमत: खर्ची टाकण्यात यावा व तो सन २०२१-२२ या वित्तीय वर्षासाठी मंजूर करण्यात आलेल्या अनुदानातून भागविण्यात यावा.

३. हा शासन निर्णय वित्त विभागाचा अनौपाचारिक संदर्भ क्रमांक २५९/व्यय-३, दिनांक २९.०७.२०२१ च्या सहमतीने निर्गमित करण्यात येत आहे.

४. सदर शासन निर्णय महाराष्ट्र शासनाच्या www.maharashtra.gov.in या संकेतस्थळावर उपलब्ध करण्यात आला असून त्याचा संकेतांक २०२११००११११३६३९४१२८ असा आहे. हा आदेश डिजीटल स्वाक्षरीने साक्षांकित करुन काढण्यात येत आहे.

महाराष्ट्राचे राज्यपाल यांच्या आदेशानुसार व नावाने.

Vasant Bhimrao Mane

Digitally signed by Vasant Bhimrao Mane
DN: c=IN, o=GOVERNMENT OF MAHARASHTRA, ou=WATER SUPPLY AND SANITATION DEPARTMENT, postalCode=400032, st=Maharashtra, 2.5.4.20=280e2beac20f526041fee94f6226522e1407a7f6aa0b06c8769634d48c2976bc, pseudonym=04E9E52AD2D2BFBC7A8BAB7F38309149E2A32DAE, serialNumber=4412BECACEF186C3494A7DFFC4896B9FFD9D66E8EC00DF8E35709DC13741075D, cn=Vasant Bhimrao Mane
Date: 2021.10.01 11:57:06 +05'30'

**(वसंत माने )**

**उप सचिव, महाराष्ट्र शासन**

प्रत,

१. महालेखाकार, (लेखा परीक्षा / लेखा व अनुज्ञेयता) महाराष्ट्र-१, मुंबई
२. महालेखाकार, (लेखा परीक्षा / लेखा व अनुज्ञेयता) महाराष्ट्र-२, नागपूर
३. अपर मुख्य सचिव, वित्त विभाग, मंत्रालय, मुंबई
४. विभागीय आयुक्त, नागपूर
५. जिल्हाधिकारी, वर्धा
६. मुख्याधिकारी, नगरपरिषद हिंगणघाट
७. जिल्हा कोषागार अधिकारी, वर्धा
८. अपर मुख्य सचिव, पाणी पुरवठा व स्वच्छता विभाग, यांचे स्वीय सहायक
९. उप सचिव (पापु १४) पाणी पुरवठा व स्वच्छता विभाग, यांचे स्वीय सहायक
१०. पापु १४ (निवडनस्ती)